सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये खरेदी करण्यात आलेल्या रुग्णालयीन कापड-चोपड (Patients dress Cloth (Sky blue) ३६ “) या बाबींच्या खरेदीची देयके भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१० E ४८२ अंतर्गत २१ - पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टाखाली रु. ४७,२५,०००/- (अक्षरी रुपये सत्तेचाळीस लाख पंचवीस हजार फक्त) इतक्या रकमेची खरेदी निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा -१२२३/प्र.क्र.४६/आरोग्य-८**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३१ मार्च , २०२३.

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र .प्रशामा -२०२१८-आरोग्य/१६२.क्र.प्र/, दि.२०.१०.२०२१
२) सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये मुंबई (राज्यस्तर) यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-४/कापड-चोपड/खरेदी/सुप्रमा/१२३७/२३ दि.१३.०२.२०२३
३) सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये मुंबई (राज्यस्तर) यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-४/कापड-चोपड/खरेदी/सुप्रमा/१२३८-३९/२१०५/२३ दि.०६.०३.२०२३
४) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक ०२.०२.२०२३ रोजीची मान्य टिप्पणी.

प्रस्तावना:-

सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई, यांनी त्यांच्या दिनांक १३.०२.२०२३ व दिनांक ०६.०३.२०२३ रोजीच्या प्रस्तावात नमूद केल्यानूसार उपरोक्त दि.२०.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये खरेदी करण्यात आलेल्या रुग्णालयीन कापड-चोपड (Patients dress Cloth (Sky blue) ३६ “) या बाबींच्या खरेदीची देयके भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१० E ४८२ अंतर्गत २१ - पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टाखाली रु. ४७,२५,०००/- (अक्षरी रुपये सत्तेचाळीस लाख पंचवीस हजार फक्त) इतका खर्च अपेक्षित असून सदर खर्च सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु.४,२०,००,०००/- इतक्या शिल्लक अनुदानातुन भागविण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई, यांनी त्यांच्या दिनांक १३.०२.२०२३ व दिनांक ०६.०३.२०२३ रोजीच्या प्रस्तावात नमूद केल्यानूसार सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये खरेदी करण्यात आलेल्या रुग्णालयीन कापड-चोपड (Patients dress Cloth (Sky blue) ३६ ") या बाबींच्या खरेदीची देयके भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१० E ४८२ अंतर्गत २१ - पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टाखाली रु. ४७,२५,०००/- (अक्षरी रुपये सत्तेचाळीस लाख पंचवीस हजार फक्त) इतका खर्च अपेक्षित असून सदर खर्च सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु.४,२०,००,०००/- इतक्या शिल्लक अनुदानातुन भागविण्यात येणार आहे. सदर बाबींच्या खरेदीसाठी खालील नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहुन सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर खरेदीसाठीचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

**विवरणपत्र-अ**

**अनुदानाचा तपशिल**

**(रक्कम रुपयांत)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजुर अनुदान | बीडीएस प्रणालीवर शिल्लक अनुदान(सन २०२२-२३) | सुधारित प्र.मा.ची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | २२१० E ४८२ | १०,००,००,००० | ४,२०,००,००० | ४७,२५,००० |

**विवरणपत्र- ब**

**खरेदीचा तपशिल**

**(रक्कम रुपयांत)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | खरेदीचा तपशील | बीडीएस प्रणालीवर शिल्लक अनुदान (सन २०२२-२३) | सुधारित प्र.मा.ची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | २२१० E ४८२ | Patients dress Cloth (Sky blue) ३६" | ४,२०,००,००० | ४७,२५,००० |

**०२.** उपरोक्त प्रस्तावासाठी आयुक्त ,आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी त्यांच्या दि.०२.०२.२०२३ रोजीच्या टिप्पणीअन्वये मान्यता दिलेली आहे. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात रुग्णालयीन कापड-चोपड (Patients dress Cloth (Sky blue) ३६" )या बाबींची खरेदी करण्यात आली असून त्या अनुषंगाने परिशिष्ट- अ प्रमाणपत्र सादर केलेले आहे.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार खालील अटींच्या अधीन राहून सदर प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदरहू औषधांची आवश्यकता खातरजमा/मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू औषधांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. आणि त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये खरेदी करण्यात आलेल्या रुग्णालयीन कापड-चोपड (Patients dress Cloth (Sky blue) ३६ ") या बाबींच्या खरेदीची देयके भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१० E ४८२ अंतर्गत २१ - पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टाखाली रु. ४७,२५,०००/- (अक्षरी रुपये सत्तेचाळीस लाख पंचवीस हजार फक्त) इतका खर्च अपेक्षित असून सदर खर्च सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु.४,२०,००,०००/- इतक्या शिल्लक अनुदानातुन इतक्या

अर्थसंकल्पीत अनुदानातून भागविण्यात यावा . सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

८) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९) सदर बाबींवरील खर्च सन २०२२-२३ या वित्तीय वर्षातील उपलब्ध अनुदानातुन व प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करण्यात यावा.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग- २/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी - २०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**०४.** उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये मुंबई (राज्यस्तर) व आयुक्त, आरोग्य सेवा संचालनालय मुंबई व संबंधित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

**०५.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०११५२२०१९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT PANDURANG GAIKWAD

Digitally signed by VASANT PANDURANG GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=6762a1c7f462bd961625d44d6971dc2c9f06f3437a7f750c414e77ec2b7f466d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7C71DE18A037CE1808BB4E1BA5462D93EB69C5FEB96700EDA8ADF1B3C9C753F8, cn=VASANT PANDURANG GAIKWAD
Date: 2023.03.31 18:08:02 +05'30'

**(व.पां.गायकवाड)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) अतिरिक्त संचालक,मानसिक आरोग्य , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
१०)अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
११)निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
१२)अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)